**लुईस बर्गर या कंपनीने सल्लागार म्हणून काम करताना काही अनियमितता केल्या आहेत किंवा कसे याचा तपास करण्यासाठी चौकशी समिती नेमणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस २०१५/प्र.क्र.१३८५/पोल-११**
दुसरा मजला, गृह विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ७ ऑक्टोबर, २०१५

**प्रस्तावना :-**

लुईस बर्गर सल्लागार कंपनीने गोवा राज्यात केलेल्या कामाच्या संदर्भात अनेक अनियमितता केल्यामुळे गोवा राज्य सरकारने सदर कंपनीची चौकशी सुरू केलेली आहे. महाराष्ट्र राज्यामध्येही अनेक महत्वाच्या प्रकल्पांमध्ये सदर कंपनीने महाराष्ट्र राज्य शासनाचे सल्लागार म्हणून काम केलेले आहे.

गोवा राज्यामध्ये सदर कंपनीने केलेल्या अनियमितता निदर्शनास आल्यानंतर सदर कंपनीला नेमून दिलेल्या कामाबाबत महाराष्ट्र राज्यामध्येही या कंपनीने अनियमितता केलेल्या आहेत किंवा कसे याबाबत चौकशी समिती नेमण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तरी आता शासन या प्रकरणी पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्यामध्ये लुईस बर्गर या कंपनीने सल्लागार म्हणून काम करताना राबविण्यात आलेल्या प्रकल्पांच्या बाबतीत या प्रकल्पाच्या अंमलबाजवणीसाठी कंपन्यांची निवड करताना, निवड प्रक्रियेमध्ये पाळण्यात आलेली पारदर्शकता, त्यांना देण्यात आलेले दर, त्यांच्याकडून करण्यात आलेली कामे व कामांची गुणवत्ता याचा तपास करुन त्यामध्ये काही अनियमितता झाल्या आहेत किंवा कसे ? याबाबतची चौकशी करण्यासाठी १ सदस्यीय समिती गठित करण्याचा निर्णय शासनाने घेतला असून सदर समिती सदस्य अपर मुख्य सचिव (गृह) हे राहतील.

लुईस बर्गर कंपनीचे पदाधिकारी / अधिकारी / कर्मचारी यांना तसेच सदर कंपनीने महाराष्ट्र राज्यातील सल्ला दिलेल्या प्रकल्पांशी संबधित पदाधिकारी / अधिकारी / कर्मचारी / इतर व्यक्ती यांना चौकशीसाठी बोलविण्याचा अधिकार सदर चौकशी समितीस राहील.तसेच सदर प्रकरणांशी संबधित सर्व नस्त्या संबधित संस्था / लुईस बर्गर कपंनी यांचेकडून मागविण्याचा अधिकार सदर चौकशी समितीस राहील.

सदर समितीच्या कामकाजाच्या संदर्भात आवश्यक ते सहाय्य पुरविण्याचे काम उप सचिव (पोल-११,१२,१३) हे करतील. सदर समितीने आपला चौकशी अहवाल तीन महिन्यात सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००८१६४४५३६९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: CN = Suresh Mahadeo Khade, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.10.08 17:44:00 +05'30'

**( सु.म.खाडे )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे व ग्रामीण) यांचे स्वीय सहायक
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
४. अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
७. उपसचिव (पोल-११,१२,१३) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (पोल-११)